**श्री. चंदु बाबुलाल मांगले यांना मा. न्यायालयाच्या आदेशानुसार न्या. कालेलकर करारानुसार पुर्वलक्षी प्रभावाने रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : काव्याआ.६६२१/प्र.क्र.४६/आस्था-१०**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई -४०० ००१
दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०२१

संदर्भ :- १) शासन निर्णय क्रमांक सार्वजनिक बांधकाम क्र. रुअआ-१५९६/२२८/सेवा-५ दि. २४ एप्रिल, २००१

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद वर्धा यांचे पत्र क्र.जिपव/बांध/ स्था-५ /कोर्टप्र/वशि/४४८/२१, दिनांक २२/०९/२०२१.

प्रस्तावना : -

रोजंदारी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना न्या. कालेलकर करारानुसार पुर्वलक्षी प्रभावाने रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने धोरणात्मक निर्णय घेतला असुन, जे कर्मचारी सार्वजनिक बांधकाम विभाग दिनांक २४/०४/२००१ च्या शासन निर्णयामधील अटीची पुर्तता करतील त्यांना न्या.कालेलकर करारानुसार लाभ देण्यासाठी रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे.

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२४/०४/२००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील अट क्र.१ नुसार रोजदांरी /कार्यव्ययी आस्थापनेवरील जे कर्मचारी शासन सेवेत / जिल्हा परिषद सेवेत कार्यरत आहेत आणि त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासुन त्यांच्या सलग सेवेस उशिरात उशिर दिनांक ३१/१२/१९९८ रोजी ५ वर्षे व प्रत्येक वर्षी कामाचे २४० दिवस पुर्ण झालेली आहे आणि करारातील अटी पुर्तता करतील अशा कर्मचाऱ्यांना पुर्वलक्षी प्रभावाने रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. तसेच अट क्रमांक २ नुसार रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना त्यांच्या सेवेची आवश्यकता नसल्यामुळे शासकिय सेवेतुन कमी करण्यांत आलेले होते तथापी ज्या कर्मचाऱ्यांनी अशा कपातीविरुध्द न्यायालयात दावे दाखल केलेले आहेत अशा कर्मचाऱ्यांपैकी ज्यांना न्यायालयाच्या निर्णयानुसार पुन:स्थापीत करण्यात आलेले आहे अशा कर्मचाऱ्यांना पुर्वलक्षी प्रभावाने रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविलेले आहे. याचबरोबर परिच्छेद क्र.२ नुसार ज्या कर्मचाऱ्यांनी न्यायालयात दावे /रिव्हिजन /अपील /अवमान याचीका दाखल केलेली आहे अश्या सर्व कर्मचाऱ्यांनी सर्व प्रकारचे दावे विनाअट मागे घेतल्यानंतर त्यांना रूपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

न्या. कालेलकर करार मागणी -१ रोजंदारी आस्थापना परिच्छेद -२८ मध्ये नियमीत आस्थापनेवर नेमणुक मिळण्याबाबत खालील तरतुद आहे.

" रूपांतरीत अस्थायी आस्थापनेवर कामगार नेमला गेला की , त्याला मुंबई मुलकी सेवा नियम लागु होतात."

०२. श्री. चंदु बाबुलाल मांगले हे जिल्हा परिषद, वर्धा, बांधकाम विभागांतर्गत हजेरी सहायक म्हणून दिनांक १४/०१/१९८४ पासून कार्यरत होते. त्यांना दि.१८/०१/१९८८ रोजी कामावरून कमी करण्यात आल्याने कामगार न्यायालय, वर्धा येथे त्यांनी दाखल केलेल्या युएलपी अर्ज क.३/१९८८ मध्ये मा. न्यायालयाच्या दि.२२/०९/२००४ च्या आदेशानुसार श्री. मागले यांना सेवेतून कमी केल्याचे आदेश मागे घेऊन कामावर पूर्ववत घेण्यात यावे आणि सेवासातत्य देऊन थकबाकी अदा करावी, असा निर्णय दिला. याआदेशांविरूद्ध जिल्हा परिषद, वर्धा ( बांधकाम विभाग ) यांनी मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर येथे दाखल केलेल्या युएलपी अर्ज क्र.१४/२०१२ मध्ये न्यायालयाने दिनांक १२/०२/२०१३ रोजी पारित केलेल्या आदेशानुसार मा. कामगार न्यायालयाचा आदेश कायम ठेवले आहेत. श्री. मांगले यांनी मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर येथे युएलपी क्र.२१९/२०१६ दाखल करून त्यांना कालेलकर करारानुसार रूपांतरीत नियमित स्थायी आस्थापनेवर घेण्याची मागणी केली. मा. औद्योगिक न्यायालयाने दि.१४/११/२०१८ रोजी निर्णय देऊन श्री. मांगले यांना रूपांतरीत नियमित अस्थायी आस्थापनेवर घेऊन आवश्यक ते सर्व लाभ देण्याचे तसेच मा. कामगार न्यायालयाने युएलपी क्र.३/१९८८ मध्ये पारित केलेल्या आदेशांची अंमलबजावणी करण्याचे आदेश दिले आहेत. मा. औद्योगिक न्यायालयाच्या वरील आदेशांविरूद्ध जिल्हा परिषद, वर्धा यांनी मा. उच्च न्यायालय नागपूर खंडपीठ येथे दाखल केलेली रिट याचिका क्र.५४४४/२०१९ दिनांक (०६/०८/२०१९ चे आदेश) खारीज करण्यात आली आहे. यादरम्यान मा. कामगार न्यायालय, वर्धा येथे श्री. मांगले यांनी Cr.ULP No.८/२०१९ अन्वये अवमान याचिका दाखल केली आहे.

शासनाचे स्थायी आदेश, मा. औद्यागिक न्यायालय, मा. कामगार न्यायालय, मा. उच्च न्यायालयाचा निर्णय आणि त्यानंतर मा. सर्वोच्च न्यायालयाने जिल्हा परिषद, वर्धा यांची SLP याचिका खारीज केल्यामुळे मा. कामगार न्यायालय- वर्धा येथे प्रस्तुत प्रकरणात दाखल अवमान याचिकेच्या पार्श्वभूमीवर एकंदर वस्तुस्थिती लक्षात घेता, श्री. चंदु मांगले यांना सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक २४/०४/२००१ रोजीच्या शासन निर्णयामधील अटी- शर्तीस अनुसरून मा. कालेलकर करारातील तरतूदीनुसार रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यासंदर्भात शासन स्तरावरून ठोस निर्णय घेणे आवश्यक असून त्यानुषंगाने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय-</u>**

रोजंदारी /कार्यव्ययी आस्थपनेवरील कर्मचा-यांना रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र. रूअआ-१५९६/ २२८/सेवा -५ दिनांक २४/०४/२००१ मधील तरतुदी विचारात घेऊन मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांच्या प्रस्तावांतर्गत नमूद केल्यानुसार आणि सोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये नमुद केल्याप्रमाणे श्री. चंदु बाबुलाल मांगले यांना रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये संबंधित रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्याच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्र. ६ मधील पदावर व रकाना क्र. ७ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासुन रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे.

०२. शासनाच्या या निर्णयानुसार श्री. चंदु बाबुलाल मांगले यांना रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या. कालेलकर कराराच्या तरतुदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन पुढील प्रमाणे करण्यात येईल.

१) श्री.मांगले, रोजंदारी कर्मचारी यांना रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून ३१ ऑक्टोबर २०२१ पर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) त्या त्या वर्षाच्या ऑक्टोबर महिन्यांत संबंधित कर्मचाऱ्याच्या भविष्य निर्वाह निधीत दहा (त्यांच्या सेवानिवृत्तीला शिल्लक कालावधी विचारात घेऊन जास्तीत जास्त १० हफ्ते) समान हप्त्यात जमा करण्यात यावी व प्रत्येक हप्ता त्यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा झाल्यापासून ३ वर्षापर्यंत सदर रक्कम त्यांना खात्यातून काढता येणार नाही. दिनांक ३१ ऑक्टोबर २०२१ पासून पुढील वेतनवाढीतील फरकाची रक्कम सर्व प्रकारच्या भत्त्यासहित ही त्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

२) श्री. मांगले सदरहू आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापर्यंत दरम्यानच्या काळात सेवानिवृत्त होत असतील किंवा स्वेच्छानिवृत्ती घेत असतील, तर अशावेळी त्यांना रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) त्यांना अनुज्ञेय होणारी थकबाकीची संपूर्ण रक्कम ही त्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

३) वर नमुद केलेल्या थकबाकीच्या रक्कमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबधित कर्मचाऱ्याकडुन अथवा दिवगंत कर्मचाऱ्याच्या वारसाकडुन भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यांत येणार नाही. अशा प्रकारचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील.

०३. संबधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयान्वये कर्मचाऱ्याला चालु आर्थिक वर्षात अदा करावा लागणारा खर्च मंजुर अनुदानातुन करावयाचा आहे.

०४. रूपांतरीत नियमीत अस्थायी आस्थपानेवर आदेश निर्गमित झाल्यानंतर सदर आदेश उपरोक्त कर्मचाऱ्यांना मान्य नसल्यास त्यांनी त्याबदलचे लेखी प्रतिवेदन त्याला व्यक्ती निहाय आदेश मिळाल्यापासुन तीन महीन्यात सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्यांचे काढलेले आदेश अंतीम समजण्यात येतील. व त्यांनतर त्यांची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

**०५.** अस्थायी आस्थापनेवर रूपांतरीत झालेले पद संबधित पदधारक ज्या दिनांकापर्यत सेवेत असतील त्या दिनांकापर्यत चालु ठेवण्यात येत आहे त्यांनतर सदरची पदे व्यपगत होतील.

**०६.** हे आदेश शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रं. रुअआ-१५९६/२२८/सेवा -५ दिनांक २४.४.२००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्यांचा संकेताक २०२१११०३१६११२५७०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Ishwar Giri

Digitally signed by Ravindra Ishwar Giri
DN: CN = Ravindra Ishwar Giri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Date: 2021.11.03 16:15:08 +05'30'

**( र. ई. गिरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (ग्रा.वि) यांचे स्विय सहाय्यक , मंत्रालय, मुंबई-४०००३२
२. मा. राज्यमंत्री ,(ग्रा.वि) यांचे स्विय सहाय्यक , मंत्रालय, मुंबई-४०००३२
३. अ.मु.स. (ग्रामविकास) बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई -४००००१
४. अपर मुख्य सचिव , वित्त विभाग , मंत्रालय मुंबई -४०००३२
५. अपर मुख्य सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय मुंबई -४०००३२
६. विभागीय आयुक्त , नागपूर विभाग, नागपूर
७. मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, वर्धा
८.महालेखापाल , महाराष्ट्र -१ मुंबई /महाराष्ट्र -२ नागपुर
९. मुख्य लेखा तथा वित्त अधिकारी , जिल्हा परिषद, वर्धा.
१०. वित्त विभाग, (व्यय-१५) मंत्रालय, मुंबई-४०००३२
११. निवड नस्ती, कार्यासन, आस्था -१०.

***

**परिशिष्ट-"अ"**

शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक : - काव्याअ६६२१/प्र.क्र.४६/आस्था-१०, दिनांक ०३ नोव्हेंबर, २०२१ चे सहपत्र

| **अ.क्र** | **कर्मचाऱ्याचे नाव** | **आस्थापनेचा प्रकार** | **नेमणुकीचे पद** | **विभागाचे नांव** | **रूपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाच्या पदाचे नाव** | **रूपांतरीत अस्थायी आस्थपनेवर घेण्याचा दिनांक** |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | ७ |
| १) | श्री. चंदु बाबुलाल मांगले | रोजंदार मजूर | लिपीक | जिल्हा परिषद- वर्धा | मजूर | दि.१५/०१/१९९१ |

Ravindra Ishwar Giri

Digitally signed by Ravindra Ishwar Giri
DN: CN = Ravindra Ishwar Giri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Date: 2021.11.03 16:15:22 +05'30'

**( र. ई. गिरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**